**एकात्मिक पाणलोट विकास कार्यक्रमांतर्गत अपूर्ण पाणलोट प्रकल्प गतीमान पद्धतीने पूर्ण करण्यासाठी आर्थिक वर्ष २०२४-२५ मध्ये निधी वितरित करण्याबाबत.**
**निधी वितरण आदेश क्र.१/२०२४-२५.**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: जशिअ-२०२४/प्र.क्र.७४/जल-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ फेब्रुवारी, २०२५

**वाचा:**

१) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्रमांक जलसं १०९५/प्र.क्र.२५०/जल-७, दि.३० जानेवारी,१९९६

२) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्रमांक आदर्श २००७/प्र.क्र.१२१/जल-७, दि.३० नोव्हेंबर, २००७

३) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्रमांकः जलसं २००८/प्र.क्र.५६/जल-७, दि. ११ एप्रिल, २००८ व दि.१७ एप्रिल, २००८

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४

**प्रस्तावना :**

अपूर्ण पाणलोटांची कामे जलद गतीने पूर्ण करण्याच्या उद्देशाने संदर्भाधीन शासन निर्णय दि.३० नोव्हेंबर, २००७ अन्वये राज्यातील ३५३ तालुक्यात प्रत्येकी किमान १ याप्रमाणे ३५३ पाणलोट गतिमान पद्धतीने पूर्ण करण्याचा धडक कार्यक्रम राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

सदर योजनेंतर्गत सन २००७-०८ पासून आजपर्यंत १२,३४४ पाणलोटांना सुकाणू समितीने मान्यता दिली असून १०,६९५ पाणलोट पूर्ण झाले आहेत. संचालक, मृद संधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांनी निधी मागणी केल्यानुसार सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता एकात्मिक पाणलोट विकास कार्यक्रमांतर्गत अपूर्ण पाणलोट प्रकल्प गतीमान पद्धतीने पूर्ण करण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

एकात्मिक पाणलोट विकास कार्यक्रमांतर्गत अपूर्ण पाणलोट प्रकल्प गतीमान पद्धतीने पूर्ण करण्यासाठी सन २०२४-२५ मध्ये राज्यस्तरावर रू.२०००.०० लक्ष अर्थसंकल्पीत तरतूद मंजूर आहे. मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी रू.६००.०० लक्ष निधी वितरणासाठी बीम्स प्रणालीवर उपलब्ध आहे. संचालक, मृद संधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांनी मागणी केलेनुसार खालील तक्त्यातील स्तंभ २ मध्ये नमूद नंदुरबार व धुळे या जिल्ह्यांना स्तंभ ४ मध्ये नमूद करण्यात आलेला **रु. ६००.०० लक्ष (अक्षरी रुपये सहाशे लक्ष फक्त)** इतका निधी खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

| | | | **(रु. लक्ष)** |
|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **जिल्हा** | **निधी मागणी** | **वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | नंदुरबार | ६०५.८४ | ४४५.०४ |
| २ | धुळे | २१०.९४ | १५४.९६ |
| **एकूण** | | **८१६.७८** | **६००.००** |

२. उपरोक्त निधी नंदूरबार व धुळे या जिल्हयांस वितरीत करण्यासाठी आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून संबंधित जिल्ह्यांचे जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी हा **"मागणी क्र. झेडएच-५, ४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च, २०३-जमिन पुनर्रचना व विकास, (०१) पाणलोट क्षेत्र विकास कार्यक्रम, (०१)(०२) मृद संधारणाच्या उपाययोजनांद्वारे जमिनीचा विकास (कार्यक्रम), ५३-मोठी बांधकामे, ४४०२ २८१४** या लेखाशिर्षाखाली खर्च करण्यात यावा. सदरचा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४ मध्ये नमूद अटी व शर्तीस अनुसरून खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

५. उपरोक्त निधी हा ज्या प्रयोजनासाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याची जबाबदारी आयुक्त (कृषी), पुणे यांची राहील. वितरीत केलेल्या निधीतून झालेल्या कामांचा मासिक प्रगती अहवाल न चूकता शासनास सादर करावा. तसेच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र तात्काळ शासनास सादर करावे.

६. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१/०४/२०२४ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४ अन्वये प्रशासकीय विभागाला दिलेल्या अधिकारास अनुसरून, तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०/२०२५/का-१४३४, दि.०४/०२/२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८९/२०२५/व्यय-१५, दि.११/०२/२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०२२११५०४४६५९२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by DEVENDRA PANDIT BHAMARE
Date: 2025.02.21 15:06:24 +05'30'

**( देवेंद्र भामरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे अप्पर मुख्य सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) सर्व मा.विधान सभा/ विधान परिषद सदस्य, विधान भवन, मुंबई
५) मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव
६) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,मंत्रालय, मुंबई (सर्व)
७) विभागीय आयुक्त (सर्व)
८) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
९) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे
१०) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
११) महालेखापाल (लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य,१ व २, मुंबई व नागपूर
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार व धुळे
१३) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग (खुद्द)
१४) निवड नस्ती (जल-७)